महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी समिती स्थापन करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मभावा-२०२०/प्र.क्र.७१/भाषा-२**

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक : २४ ऑगस्ट, २०२०**

**वाचा :-**

१. महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक. ओएफएल १०६६ (एक) / एम, दि.३०.०४.१९६६
३. विधि व न्याय विभाग, महाराष्ट्र राजभाषा (सुधारणा ) अधिनियम, दि.२१.०८.२०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ अन्वये दि. २६ जानेवारी, १९६५ पासून महाराष्ट्र राज्याची राजभाषा म्हणून देवनागरी लिपीतील मराठी भाषेचा अंगीकार करण्यात आला. तसेच सदर अधिनियमांतर्गत महाराष्ट्र राजभाषा (वर्जित प्रयोजने) नियम १९६६, दि. ३० एप्रिल, १९६६ च्या अधिसूचनेन्वये अंमलात आले आहेत. सदर नियमात नमूद केलेली वर्जित प्रयोजने वगळता सर्व शासकीय प्रयोजनांकरिता मराठी भाषा वापरणे दि.०१ मे, १९६६ पासून अनिवार्य करण्यात आले आहे. त्यानुसार प्रशासकीय कामकाजात मराठी भाषेचा जास्तीत जास्त वापर सर्व शासकीय कार्यालयांनी करणे आवश्यक आहे. अधिनियमामध्ये राजभाषेचा स्पष्ट उल्लेख करण्याच्या उद्देशाने राजभाषा अधिनियम, १९६४ च्या कलम १ व कलम २ (क) मध्ये दि.२१.०८.२०१५ च्या राजपत्रानुसार सुधारणा करण्यात आली आहे.

१९६४ च्या अधिनियमातील तरतूदी व त्या अंतर्गत केलेले नियम केवळ वर्जित प्रयोजनापुरते मर्यादित असल्याने सदर अधिनियम कोणाकोणाला लागू आहेत याबाबत त्यामध्ये उल्लेख नाही. त्यामुळे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, स्थानिक स्वराज्य संस्था इ. मार्फत मराठी भाषेचा वापर फारसा केला जात

नाही. तसेच मराठी भाषेचा वापर प्रशासकीय कामकाजात न करणाऱ्या कर्मचाऱ्यांवर कारवाई करण्याची तरतूद अधिनियमामध्ये नाही. त्यामुळे सदर अधिनियम सुधारीत करून तो निमशासकीय कार्यालये, अशासकीय कार्यालये, शासन अनुदानित संस्था, शैक्षणिक संस्था, शासन अंगीकृत व्यवसाय (मंडळे, महामंडळे, प्राधिकरणे), सर्व आयोग, न्यायाधिकरणे, सर्व दुय्यम न्यायालये, खाजगी क्षेत्र इत्यादींना लागू करावा अशी मागणी विविध संस्था, मान्यवर यांच्याकडून करण्यात येत होती. त्यामुळे महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रशासकीय कामकाज, न्यायालयीन कामकाज तसेच सार्वजनिक क्षेत्रातातील दैनंदिन व्यवहारातील कामकाजात मराठी भाषेचा जास्तीत जास्त वापर करण्याकरीता इतर राज्यांतील राजभाषा अधिनियमांचा अभ्यास करून महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ सुधारीत करण्यासाठी शिफारशी करून नियमांचा मसुदा प्रस्तावित करण्याकरीता तज्ज्ञ व्यक्तींची " **महाराष्ट्र राजभाषा अधिनियम समिती** " पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **सदस्यांची नावे** | **पद** |
|---|---|---|
| १. | श्रीमती प्राजक्ता लवंगारे-वर्मा, सचिव, मराठी भाषा विभाग | अध्यक्ष |
| २. | श्री. कि. भि. पाटील, उप प्रारुपकार - नि - उप सचिव, विधि व न्याय विभाग | सदस्य |
| ३. | श्री. रमेश पानसे, मराठी भाषा तज्ज्ञ | सदस्य |
| ४. | श्री. सं.पु. सैंदाणे, प्रभारी सहायक संचालक, भाषा संचालनालय | सदस्य |
| ५. | श्रीमती. नंदा राऊत, अवर सचिव, मराठी भाषा विभाग | सदस्य सचिव |

२. महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील:-

१) इतर राज्यांच्या व केंद्रसरकारच्या राजभाषा नियमांतील तरतुदींचा तुलनात्मक अभ्यास करुन महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ मध्ये सुधारणा करण्यासाठी शासनास शिफारशी सादर करणे. समितीमार्फत शासनास करण्यात येणाऱ्या शिफारशींमध्ये प्रामुख्याने पुढील बाबींचा समावेश असावा.

**अ.** सदर अधिनियमातील तरतूदी प्रशासकीय कामकाजाशिवाय आणखी कोणकोणत्या क्षेत्राला लागू राहतील, त्याची व्याप्ती काय असेल त्याचा स्पष्ट उल्लेख शिफारशींमध्ये करावा. उदा:- सार्वजनिक उपक्रम, स्थानिक स्वराज्य संस्था, अशासकीय शैक्षणिक/वैद्यकीय संस्था, खाजगी क्षेत्र इ.

**ब.** सदर अधिनियमाची अंमलबजावणी योग्य तऱ्हेने सर्व विभागांकडून होण्यासाठी प्रत्येक विभागाने त्यांच्या कार्यक्षेत्रातील नियमांमध्ये मराठी भाषा वापरण्याबाबत उल्लेख करण्यासंदर्भात तसेच, विशेषत: माहिती व तंत्रज्ञान क्षेत्रात मराठी भाषेचा वापर वाढविण्यासंदर्भात अधिनियमामध्ये कशी तरतूद करावी लागेल, याबाबत शिफारस करणे.

**क.** दुय्यम न्यायालये आयोग, प्राधिकरणे, न्यायाधिकरणे देत असलेल्या निवाड्यांमध्ये मराठी भाषेचा वापर वाढविण्यासाठी शिफारस करणे.

**ड.** अधिनियमातील तरतुदींनुसार मराठी भाषेचा वापर न करणाऱ्यांवर संबंधित विभागामार्फत दंडात्मक कारवाई करण्याची तरतूद करणेसंदर्भात शिफारस करणे.

**इ.** उपरोक्त अ ते ड संदर्भात निर्णय घेण्यासाठी इतर संबंधित विभागांशी चर्चा करणे आवश्यक असल्यास अशा संबंधित विभागांच्या सचिवांची बैठक आयोजित करण्यासंदर्भात शिफारस करणे.

२) महाराष्ट्र राजभाषा अधिनियम, १९६४ च्या सुधारित नियमांचा मराठी व इंग्रजी मसुदा तयार करुन शासनास सादर करणे.

३) समितीने त्यांच्या शिफारशींसह प्रस्तावित नियमांचा मसुदा २ महिन्यांत शासनास सादर करावा. समिती अध्यक्ष व सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित धोरणानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता देण्यात येईल.

४) समितीचे अध्यक्ष व सदस्य यांना वित्त विभाग, शासन निर्णय दि. ३ मार्च, २०१० व दिनांक २४ मे, २०१२ च्या आदेशानुसार प्रवास भत्ता, दैनिक भत्ता तसेच बैठक भत्ता अनुज्ञेय राहील. याबाबतचा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२४१२३८३४०२३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Harshwardhan Tukaram Jadhav

Digitally signed by Harshwardhan Tukaram Jadhav
DN: CN = Harshwardhan Tukaram Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Marathi Language Department
Date: 2020.08.24 15:50:28 +05'30'

**(हर्षवर्धन तु. जाधव)**
**प्र. उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग.
५) मा. प्रारुपकार तथा सहसचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, मराठी भाषा यांचे विशेष कार्य अधिकारी , मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर.
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) अध्यक्ष व सदस्य, महाराष्ट्र राजभाषा अधिनियम समिती.
१२) भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई.
१४) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई.
१५) संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई.
१६) सहायक भाषा संचालक, विभागीय कार्यालय, नवी मुंबई/ पुणे/नागपूर/औरंगाबाद.
१७) अवर सचिव, (व्यय-४)/सेवा-५/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व मंत्रालयीन विभाग.
१९) सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) संग्रहार्थ (भाषा - २).